महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत प्रशासकीय मंजूरी देण्यात आलेल्या नागरी पाणी पुरवठा व मलनि:स्सारण योजनांना अनुदान वितरीत करण्याबाबत.
इंदापूर नगरपरिषद, जि. पुणे.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः सुनिअ २०१३/प्र.क्र.४९७/पापु-२२

गो.ते. हॉस्पिटल संकुल इमारत, लोकमान्य टिळक मार्ग
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: ९ सप्टेंबर,२०१४

**वाचा :**

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक सुनिअ २००८/प्र.क्र.१/पापु २२, दिनांक २२ ऑक्टोबर, २००८
२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक सुनिअ २००८/प्र.क्र.१९८/पापु २२, दिनांक २३ डिसेंबर, २००८
३) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक सुनिअ २०११/प्र.क्र.५६५/पापु २२, दिनांक १५ ऑक्टोबर, २०११

**प्रस्तावना :**

**दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ च्या शासन निर्णयान्वये नागरी पाणीपुरवठा, मलनि:सारण, शौचालय बांधकाम व घनकचरा व्यवस्थापनासंदर्भात पर्याप्त, गुणवत्तापूर्ण सेवा, किफायतशीर सेवाशुल्कामध्ये उपलब्ध करुन देणे व विविध तांत्रिक, आर्थिक व व्यवस्थापकीय सुधारणा करण्याचे उदद्दीष्ट निर्धारीत करुन महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान राबविण्यात येत आहे. राज्यातील सर्व नागरीकांना पाणी पुरवठा व मलनि:सारणाच्या सर्वव्यापक सुविधा निश्चितपणे उपलब्ध करुन देणे असा महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानाचा मुख्य उद्देश आहे.**

२. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानाच्या अंमलबजावणीसाठी विहीत करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार प्रशासकीय मंजूरी देण्यात आलेल्या स्थानिक स्वराज्य संस्थांच्या पाणी पुरवठा योजनेसाठी नागरी स्थानिक संस्थानी भरलेल्या स्वहिश्याच्या प्रमाणात अनुज्ञेय अनुदान वितरीत करण्यात येते. नगरपरिषद इंदापूर, जि. पुणे या नागरी स्थानिक संस्थेने स्वहिश्श्यापैकी रुपये १३४.०४ लक्ष इतकी रक्कम भरणा केली असल्याने त्याप्रमाणात त्यांना राज्य शासनाकडून अनुज्ञेय असलेल्या अनुदानापैकी रु.२२४.८३ लक्ष इतके अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :

महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत प्रशासकीय मंजूरी देण्यात आलेल्या नगरपरिषद इंदापूर, जि.पुणे येथील पाणीपुरवठा व मलनि:सारण योजनेस संदर्भिय अनुक्रमांक ३ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मंजूरी देण्यात आलेली असून संबंधित नागरी स्थानिक संस्थेने त्यांनी भरावयाच्या रु.३४९.४७ लक्ष इतक्या स्वहिश्श्यापैकी रु.१३४.०४ लक्ष म्हणजेच भरणा करावयाच्या एकूण रक्कमेच्या ३८.३५% इतकी रक्कम भरणा केली असल्याने इंदापूर नगरपरिषदेस अनुज्ञेय अनुदानाच्या ३८.३५% इतकी रक्कम म्हणजेच रु.१२०६.१८ लक्ष इतके अनुदान वितरीत करणे आवश्यक आहे. तथापि या विभागाच्या समक्रमांकाच्या दि.१.११.२०१३ च्या शासन निर्णयान्वये रु.४५४.५० लक्ष व दि.१८.३.२०१४ च्या समक्रमांकाच्या शासन निर्णयान्वये रु.५२६.८५ लक्ष असे एकूण ९८१.३५ लक्ष इतके अनुदान यापूर्वीच वितरीत केले असल्याने उर्वरीत म्हणजेच रुपये २२४.८३ लक्ष इतके अनुदान पुढील विवरणानुसार वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रुपये लाखात)

| अ. क्र. | शहराचे नाव | योजनेची एकूण किंमत | राज्य शासनाकडून अनुज्ञेय अनुदान (९०%) | नागरी संस्थेने निकषानूसार भरावयाची रक्कम (१०%) | नागरी संस्थेने भरलेली रक्कम | या अगोदर शासना-कडून वितरीत करण्यात आलेले अनुदान | राज्य शासना-कडून वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | इंदापूर, जि.पुणे (क वर्ग नगरपालिका) | ३४९४.६७ | ३१४५.२० | ३४९.४७ | १३४.०४ | ९८१.३५ | २२४.८३ |
| | | | | | | **एकूण :** | **२२४.८३** |

२. सदर योजनेअंतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुज्ञेय होणाऱ्या सदर अनुदानावरील खर्च मागणी क्रमांक वाय-२, २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा १९२, स्थानिक संस्था, नगर पालिका इत्यादींना सहाय्य - राज्य योजना - (०२) (०२) नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था) पाणी पुरवठा व जलनि:स्सारण योजनांसाठी सहायक अनुदान (२२१५ १६४७), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांनी सदर लेखाशिर्षाखाली शासनाकडून उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानातून उक्त विवरणपत्रातील नमूद स्तंभ क्रमांक ८ मध्ये दर्शविल्याप्रमाणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेस अनुदान वितरीत करावे, तसेच अनुदानाच्या या वितरणाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

३. संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने योजनेसाठी स्वतंत्र लेखे ठेवावेत आणि योजनेचा प्रगती अहवाल व उपयोगीता प्रमाणपत्रे नियमितपणे वेळोवेळी शासनास सादर करावी.

४. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत शासकीय अनुदान प्राप्त करुन घेण्यासाठी संबंधित नागरी संस्थेने शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक सुनिअ २००८/प्र.क्र.१/पापु-२२, दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ मधील तरतूदीचा अवलंब करणे आवश्यक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०९१५२६४०२१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PARDESHI ANAND G

Digitally signed by PARDESHI ANAND G
DN: CN = PARDESHI ANAND G, C = IN, S = Maharashtra, O = Govt. of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2014.09.10 14:32:04 +05'30'

**(आ. ग. परदेशी)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,
१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव,
२. मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव,
३.प्रधान सचिव पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
४.सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई,
५.महालेखापाल १ -मुंबई/नागपूर,
६. संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, मुंबई,
७.विभागीय आयुक्त, पुणे महसुल विभाग,
८.जिल्हाधिकारी,पुणे,
९. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागरी व ग्रामीण योजना, ठाणे,
१०. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई,
११.संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई,
१२.अध्यक्ष/मुख्याधिकारी, इंदापूर नगर परिषद, जि.पुणे,
१३.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
१४.जिल्हा प्रकल्प अधिकारी, (नगरपालिका) जिल्हाधिकारी कार्यालय, पुणे,
१५.वित्त विभाग/नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६.कक्ष अधिकारी, पापु.०४,पापु.२०,पापु.२४, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई,
१७.निवडनस्ती, पापु-२२.